**राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून मार्जिन मनी लोन योजनेंतर्गत राज्य शासनास प्राप्त झालेले रु.५९४.७६ कोटी कर्जाची रक्कम पात्र सहकारी साखर कारखान्यांना वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पूरक ०६२४ /प्र.क्र.५१/३स**
मंत्रालय विस्तार रूम नं. ६२०, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-** १. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक:ससाका २०१९/प्र.क्र.८०/३स, दि. ०५.०९.२०१९.
२. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक:ससाका२०२३/प्र.क्र.२३/३स, दि. ०४.०५.२०२३.
३. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक:ससाका ०२२४/प्र.क्र.२६/३स, दि. ०१.०३.२०२४.
४. मा. मंत्री मंडळ उपसमितीच्या दि.१२.०३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
५. विभागाचे पत्र क्र. BTK ०३२४/C.R.२८/३C, दि. २७.०३. २०२४
६. मा. मंत्री मंडळ उपसमितीच्या दि.२३.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.
७. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे क्र: NCDC: २१-८/२०२३-Sugar/२८३/SB४०२४२/ ५६,दि. २८.०६.२०२४ (कर्जमंजुरी)
८. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे क्र: NCDC:२१-८/२०२३-Sugar/७०४/RB४०७२९/ ८८,दि.३१.०७.२०२४.
९. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे क्र:NCDC:२१-८/२०२३-Sugar/४०८/SB४०३३४/ ९८,दि.१४.०८.२०२४.
१०.राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचे क्र:NCDC:२१-८/२०२३Sugar/८३७/RB४०८६६/ १०४,दि.२१.०८.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील सहकारी साखर कारखान्यांना राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed Through State Government) खेळत्या भागभांडवलासाठी मार्जिन मनी लोन उपलब्ध करून देण्यासाठी प्राप्त प्रस्तावांची तांत्रिक व आर्थिक छाननी करण्यासाठी साखर आयुक्त, पुणे यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यात आली आहे. त्यानुसार साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयात नमूद अटी व शर्तीनुसार प्रस्तावांची आर्थिक व तांत्रिक छाननी करुन प्रस्ताव शासनास सादर करण्यास व तद्नंतर सदर प्रस्ताव

मा. मंत्री (सहकार) यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीसमोर निर्णयार्थ ठेवण्यास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावांची आर्थिक व तांत्रिक छाननी करुन समितीच्या बैठकीतील चर्चेप्रमाणे आणि बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार पात्र साखर कारखान्यांचे प्रस्ताव शासनास सादर केले होते.

साखर आयुक्त कार्यालयाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर निर्णय घेण्याच्या अनुषंगाने मा.मंत्रीमंडळ उपसमितीची दि.१२.०३.२०२४ रोजी बैठक झाली. सदर बैठकीत एकूण १३ कारखान्यांना राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्याकडून खेळत्या भांडवलासाठी महाराष्ट्र शासनामार्फत (Routed Through State Government) मार्जिन मनी लोन उपलब्ध करून देण्याबाबत निर्णय घेण्यात आला. त्यानुसार सदरचे प्रस्ताव संदर्भ क्र.५ येथील पत्रान्वये राष्ट्रीय सहकार विकास निगम यांच्याकडे पाठविण्यात आले असता, त्यांनी संदर्भ क्र.७ येथील पत्रान्वये सदर प्रस्तावांना अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजुरी दिली. तद्नंतर मा. मंत्री (सहकार) यांच्या अध्यक्षतेखाली मा.मंत्रीमंडळ उपसमितीची दि.२३.०७.२०२४ रोजी पुनःश्च बैठक झाली. सदर बैठकीत पुर्वीच्या दि. १२.०३.२०२४ च्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयातील १३ कारखान्यांपैकी ११ व नवीन ५ कारखान्यांना अशा एकूण १६ पात्र कारखान्यांना मार्जिन मनी लोन उपलब्ध करुन देण्याचा अंतिम निर्णय घेण्यात आला. राष्ट्रीय सहकार विकास निगम यांनी त्यांच्या संदर्भ क्र. १० येथील पत्रान्वये एकूण ५ कारखान्यांसाठी रु.५९४.७६ कोटी (रुपये पाचशे चौऱ्याण्णव कोटी शहात्तर लाख फक्त) इतका निधी शासनास उपलब्ध करुन दिला असून, सदर निधी कारखान्यांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. मा.मंत्रीमंडळ उपसमितीच्या दि.२३.०७.२०२४ च्या बैठकीतील निर्णयानुसार राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांचेकडून महाराष्ट्र शासनामार्फत (Routed through State Government) खेळत्या भांडवलासाठी एकूण ५ पात्र सहकारी साखर कारखान्यांना रु५९४.७६. कोटी रुपये पाचशे चौऱ्याण्)व कोटी शहात्तर लाख फक्त( इतका निधी मंजूर करण्यात आला आहे.

तथापि, रावसाहेब पवार घोडगंगा सहकारी साखर कारखाना लि., ता.शिरुर, जि.पुणे यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका क्र. ११५७२/२०२४ दि.१६.०८.२०२४ रोजी दाखल केली आहे. सदर प्रकरणी दि.२१.०८.२०२४ रोजीच्या सुनावणीच्या अनुषंगाने मा.उच्च न्यायालयाने सदर साखर कारखान्यांबाबत राष्ट्रीय सहकार विकास निगम यांचेकडून महाराष्ट्र शासन मार्फत मार्जिन मनी लोन देण्यासाठी रक्कम रु.१०७.६९ कोटी दि.१९.०९.२०२४ पर्यंत राखीव ठेवण्याचे आदेश दिले आहेत. त्यामुळे पुढील तक्त्यात नमूद ५ कारखान्यांची स्तंभ

क्र.०४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे समप्रमाणात रु.१०७.६९ कोटी एवढी रक्कम राखीव ठेवण्यात येवून स्तंभ क्र. ०५ प्रमाणे उर्वरीत देय रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.कोटीत)

| अ.क्र. | सहकारी साखर कारखान्यांचे नाव | मार्जिन मनी लोन रक्कम | मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार राखून ठेवण्यात आलेली रक्कम | प्रत्यक्ष वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | विश्वासराव नाईक सहकारी साखर कारखाना लि. यशवंतनगर,पो. चिखली,जिल्हा सांगली. | ६५.०० | ११.७० | ५३.३० |
| २ | पद्म भुषण क्रांतिवीर डॉ. नागनाथ नायकवडी हुतात्मा किसन अहिर सहकारी साखर कारखाना लि.,नागनाथअण्णा नगर,वाळवे, तालुका वाळवा, जिल्हा सांगली. | १४८.९० | २७.५६ | १२१.३४ |
| ३ | अशोक सहकारी साखर कारखाना लि.,अशोकनगर, श्रीरामपूर,जिल्हा अहमदनगर. | ९०.३० | १६.२५ | ७४.०५ |
| ४ | श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि.वेणूनगर गुरसाळे, तालुका पंढरपूर,जिल्हा सोलापूर. | २६७.५९ | ४८.०५ | २१९.५४ |
| ५ | शेतकरी सहकारी साखर कारखाना लि. किल्लारी,तालुका औसा,जिल्हा लातूर. | २२.९७ | ४.१३ | १८.८४ |
| | **एकूण** | **५९४.७६** | **१०७.६९** | **४८७.०७** |

२. सदर मान्यता राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) यांच्या संदर्भ क्र.९ येथील पत्रात नमूद खालील अटीं व शर्ती, तसेच शासनाच्या संदर्भ क्र.२ येथील दि.०४.०५.२०२३ रोजीच्या शासन निर्णयात नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१. राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कर्ज मुद्दल परतफेडीचा कालावधी २ वर्षांच्या विलंबावधीसह ८ वर्षांचा असेल. तथापि, व्याज भरण्यावर कोणताही विलंबावधी लागु राहणार नाही.

२. एनसीडीसीकडून निधी प्राप्त झाल्यानंतर लगेचच संबंधित सहकारी साखर कारखान्यांना हे कर्ज दिले जाईल, या अटीसह अग्रीम तत्वावर राज्य सरकारला कर्ज वितरित करण्यात आले आहे.

३. वरील नमूद पाच सहकारी साखर कारखान्यांपैकी, श्री विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर गुरसाळे, ता. पंढरपूर, जि.सोलापूर, या कारखान्याकडे NCDC मार्जिन मनी आणि ब्रिज कर्जाचे हप्ते रु.७९७४.४४ लाख दि.२५.०७.२०१६ पासून दि.१.०८.२०२४ पर्यंत थकीत झाले आहेत. सदर कारखान्यास NCDC कडून मंजूर झालेल्या रक्कमेतून सदरची रक्कम वितरीत करण्याच्या तारखेपर्यंत देय असलेल्या पुढील व्याज / दंडात्मक व्याजासह (रू.८०.०७ कोटी), प्रथम रु.३४७.६७ कोटीच्या मंजूर कर्जातून समायोजित करण्यात आली असून उर्वरीत रक्कम (रू.२६७.६० कोटी) श्री.विठ्ठल सहकारी साखर कारखाना लि. वेणुनगर गुरसाळे, ता. पंढरपूर, जि.सोलापूर, या कारखान्यास वितरीत करण्यात यावी.

४. संबंधित साखर कारखान्यांना सूचित करण्यात येते की, राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) मार्जिन मनी कर्जाचा विनियोग साखर कारखान्यांनी सर्वप्रथम त्यांच्या विद्यमान बँक/वित्तीय संस्थांच्या कर्जाच्या थकबाकीचा भरणा करण्यासाठी (प्रथम मुदती कर्ज आणि तदनंतर खेळत्या भांडवल कर्जाच्या परतफेडीसाठी) सहकारी साखर कारखान्यांना देय वैधानिक कराची थकबाकी आणि त्यानंतर विद्यमान ऊसाची देणेबाकी / पुढील गळीत हंगामाच्या पूर्वहंगामी खर्चासाठी विनियोग करण्यास निर्देशित करण्यात येत आहे.

५. कर्जावरील व्याजाचा दर प्रत्यक्ष कर्ज वाटपाच्या वेळी किंवा राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) द्वारे घोषित केल्यानुसार असेल. कर्जावरील व्याजाची आकारणी मासिक चक्रवाढ आधारावर प्रत्येक महिन्याच्या शेवटच्या दिवशी असणा-या शिल्लक रकमेवर केली जाईल. तथापि, व्याज आणि मुद्दलाची परतफेड दरवर्षी केली जाईल. सध्या (NCDC) कर्जाचा प्रभावी व्याज दर (व्याजाचा फ्लोटिंग दर) मासिक चक्रवाढ आधारावर ९ % आहे.

कर्ज हप्त्याची परतफेड देय तारखेला किंवा त्यापूर्वी झाल्यास प्रभावी व्याज दर / घोषित केलेला व्याज दर लागू होईल. तथापि देय तारखेला किंवा त्यापूर्वी हप्त्याची परतफेड न झाल्यास, वरील व्याजाशिवाय वार्षिक १% जादा सामान्य व्याज दर लागू असेल. कर्ज हप्ता थकीत झाल्यास विलंबाच्या कालावधीसाठी वार्षिक २.५% दंडात्मक व्याज आकारले जाईल. सदरचे दंडात्मक व्याज "थकीत मुद्दल रक्कमेवरील सर्वसाधारण व्याज" आणि वार्षिक १% जादा सामान्य व्याज

दरापेक्षा जास्त आकारले जाईल. कर्ज रकमेची प्रथम उचल केल्याच्या तारखेनंतर व्याजाचा भरणा सुरू होईल. इतर अटी व शर्ती राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) च्या पत्र क्रमांक NCDC.१-१/८४-Budt, दि.१५.१०.१९८४ आणि No.NCDC.१-१/९०-Budt दि.१६.०२.२०२४ आणि वेळोवेळी सुधारित केल्यानुसार लागू असतील.

६. कर्जाचा उचित विनियोग आणि कामकाजातील प्रगती सुनिश्चित करण्यासाठी महाराष्ट्र शासन तसेच प्रादेशिक संचालनालय, राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC), पुणे यांनी साखर कारखान्यास दर तिमाहीस भेट देऊन दक्षतापूर्वक आढावा घ्यावा.

७. महाराष्ट्र शासनाची पूर्वपरवानगी आणि राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) च्या शिफारसीशिवाय सहकारी साखर कारखान्यांनी कोणत्याही प्रकल्पाची उभारणी आणि स्थिर मालमत्तेत गुंतवणूक करू नये.तथापि शेतकरी सहकारी साखर कारखाना लि.किल्लारी,तालुका औसा,जिल्हा लातूर, या कारखान्यास कर्जाची आंशिक रक्कम कारखान्याच्या १२५०TCD वरून २५००TCD पर्यंतच्या गाळप क्षमता वाढीसाठी व उर्वरीत रक्कम खेळत्या भांडवलाची पूर्तता करण्यासाठी अपवादात्मक बाब म्हणून मान्यता देण्यात येत आहे.

८. सहकारी साखर कारखान्याच्या व्यवस्थापनात कोणताही बदल झाल्यास त्याची माहिती राज्य शासनास आणि राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) ला तात्काळ देण्यात यावी.

९. सहकारी साखर कारखानदारांनी सर्व संबंधित दोन किंवा त्यापेक्षा जास्त हितसंबंधित पक्षीय व्यवहार हे प्रचलित बाजार परिस्थिती लक्षात घेऊन करण्यात यावेत.

१०. सहकारी साखर कारखान्यांच्या संचालक मंडळावर एका सदस्याची नियुक्ती करण्याचा अधिकार राष्ट्रीय सहकार विकास निगमला (NCDC) असेल. अशा बैठकांना उपस्थित राहण्याचा खर्च संबंधित साखर कारखान्याने भागवणे आवश्यक आहे.

११. सहकारी साखर कारखानदारांना सूचित करण्यात येते की, ते कर्जाची संपुर्णत: परतफेड होईपर्यंत त्यांच्या संचालक मंडळाला पगार, मानधन किंवा इतर कोणतेही भत्ते यांसारखे कोणतेही फायदे देऊ नयेत. तसेच अशा संचालकांनी धारण केलेल्या भागभांडवलावर लाभांश दिला जाणार नाही.

१२. संबंधित सहकारी साखर कारखान्यास जेथे कर्ज परतफेड पर्याप्तता प्रमाण (DSCR) एक पेक्षा कमी परिगणित करण्यात आलेला असेल तेथे संबंधित सहकारी साखर कारखान्याने रोख निधी उपलब्धतेमधील तूट त्वरित भरून काढणे आवश्यक असेल.

१३. राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कर्जाच्या संपुर्णत: परतफेड होईपर्यंतच्या कालावधीत सहकारी साखर कारखान्याचे भागभांडवल अबाधित ठेवण्यात येईल. भाग भांडवलाची काही प्रमाणत परतफेड केली गेल्यास, संबंधित सहकारी साखर कारखान्यास त्याची भरपाई करण्याबाबत सूचित करण्यात येत आहे.

१४. संबंधित सहकारी साखर कारखान्यास असेही सूचित करण्यात येते की, राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कर्जाची संपुर्णत: परतफेड होईपर्यंत यापुढील कालावधीत अंदाजित रोख निधी उपलब्धता लक्षात घेऊन कर्ज परतफेड पर्याप्तता प्रमाण (DSCR) कोणत्याही वेळी किमान एक पातळीवर राहील याची सुनिश्चिती करण्यासाठी आवश्यकतेनुसार निधी उपलब्ध करावा.

१५. सहकारी साखर कारखान्यांचे कर्ज परतफेड पर्याप्तता प्रमाण (DSCR) १.०० पट किंवा त्याहून अधिक असल्यास खालील प्रमाणे नमुद अतिरिक्त सुरक्षा तारण संबंधित साखर कारखान्यांकडून घेण्यात यावे.

i) प्रस्तावित कर्जाच्या परतफेडीसाठी सहकारी साखर कारखान्यांच्या विक्री उत्पन्नाचे टॅगिंग/एस्क्रो खात्यातुन कर्ज वसुली करणे.

ii) प्रस्तावित कर्जाच्या परतफेडीसाठी महाराष्ट्र शासनाच्या नावे पोस्ट डेटेड चेक (PDC) घेणे.

१६. सहकारी साखर कारखान्यांकडून सनदी लेखापालाने प्रमाणित केलेल्या प्रकल्प अहवाल तसेच, १.०० पट पेक्षा कमी कर्ज परतफेड पर्याप्तता प्रमाण (DSCR) असलेल्या सुरक्षा तारणाशिवाय, खालील अतिरिक्त सुरक्षा तारण देखील घेण्यात यावे:

i) चेअरमन आणि सर्व संचालक मंडळ सदस्यांची वैयक्तिक हमी.

ii) प्रस्तावित कर्जाच्या सुरक्षिततेसाठी महाराष्ट्र शासनाच्या नावाने संपूर्ण मालमत्ता तारण गहाण ठेवणे.

१७. प्रादेशिक संचालनालय, राष्ट्रीय सहकार विकास निगम NCDC, पुणे यांना सूचित करण्यात येत आहे की त्यांनी राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) कर्जाची

संपुर्णत: परतफेड होईपर्यंत सहकारी साखर कारखान्यांच्या कामकाजाची आणि आर्थिक स्थितीचे निरीक्षण करण्यासाठी कारखान्यास त्रैमासिक भेट द्यावी आणि मागील तीन वर्षांच्या आर्थिक विवरणपत्रकांच्या सर्व मूळ प्रतींचे परिशिष्टांसह रीतसर वैधानिक लैखापरिक्षण केले जात आहे याचीही खात्री करावी. साखर कारखान्याच्या व्यवस्थापन नियुक्त सनदी लेखापालाने/वैधानिक लेखापरिक्षकाने प्रमाणित केलेल्या आर्थिक लेख्यांच्या प्रती प्रादेशिक संचालनालयाच्या कार्यालयात सुरक्षितरित्या जतन कराव्यात.

१८. राज्य शासनाकडून ज्या उद्देशासाठी कर्ज सहाय्य मंजूर केले गेले आहे त्या हेतूने त्याचा वापर न केल्यास, कर्ज रक्कम रोखण्याचा आणि वसूल करण्याचा अधिकार राष्ट्रीय सहकार विकास निगमला (NCDC) असेल.

१९. राष्ट्रीय सहकार विकास निगम (NCDC) साखर कारखान्यांच्या कामकाजाची आणि आर्थिक स्थितीची तपासणी/पुनरावलोकन करण्यासाठी तिच्या अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्याचा अधिकार असेल आणि/किंवा ते इतर कोणत्याही एजन्सीमार्फत करवून घेण्याचा अधिकार असेल, ज्याचा संपूर्ण खर्च संबंधित कारखान्यांनी करणे आवश्यक राहील.

२०. कर्जासंदर्भातील कोणत्याही अटी व शर्तींचे उल्लंघन झाल्यास कर्ज मंजुरी रद्द करण्याचा आणि कर्जाची संपूर्ण रक्कम व्याजासह वसूल करण्याचा अधिकार राष्ट्रीय सहकार विकास निगमला असेल.

३. कर्ज परतफेडीबाबत अवलंबावयाची कार्यपध्दती खालीलप्रमाणे आहे.

१. सदर योजनेअंतर्गत अदा करण्यात आलेल्या कर्जाची व्याजासह (अनुज्ञेय असल्यास दंडव्याजासह) विहीत मुदतीमध्ये परतफेड करण्याकरीता साखर कारखान्याकडून प्रति क्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे तसेच प्राथमिक आणि दुय्यम उपपदार्थांच्या विक्रीमधून आवश्यकतेप्रमाणे कपात करून शासकीय कोषागारात भरणा करावयाच्या रकमांचा दरमहा भरणा करण्याकरीता संबंधीत सहकारी साखर कारखान्याचे कार्यकारी संचालक आणि संबंधीत प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त बचत बँक खाते राष्ट्रीयकृत बँकेमध्ये उघडण्यात यावे. कर्ज वितरणानंतर १ महिन्याचे आत सदरचे संयुक्त बचत खाते उघण्यात यावे.

२. सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये, साखर कारखान्याने साखर विक्रीच्या प्रत्येक व्यवहारामधून प्रति क्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे कपात करावयाच्या रकमांचा भरणा करावा.

३. या खात्यामध्ये जमा झालेल्या रकमेमधून आर्थिक वर्षामध्ये व्याज / दंडव्याजासह (अनुज्ञेय असल्यास) अदा करावयाच्या कर्जाच्या मुद्दल रकमेइतकी रक्कम जमा न झाल्यास सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये साखर कारखान्यांकडून विक्री करण्यात आलेल्या इथेनॉल, सहविजनिर्मीती प्रकल्पातील वीज, बगॅस, मोलॅसिस, प्रेसमड आणि इतर तत्सम बाबींचे विक्रीमधून प्राप्त झालेली रक्कम प्राधान्याने त्या त्या आर्थिक वर्षामध्ये अदा करावयाच्या रकमेइतकी भरणा करावी.

४. सदर संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेल्या रकमेचा वापर, फक्त या योजनेअंतर्गत परतफेड करावयाचे कर्ज मुद्दल, कर्जावरील व्याज आणि दंडव्याज (अनुज्ञेय असल्यास) परतफेड करण्याच्या प्रयोजनाशिवाय इतर कोणत्याही प्रयोजनाकरीता करता येणार नाही.

५. आर्थिक वर्षामध्ये सदर योजनेअंतर्गत परतफेड करावयाच्या मुद्दल, व्याज आणि दंडव्याज (अनुज्ञेय असल्यास) रकमांचे आर्थिक वर्ष सुरू होण्यापूर्वी निर्धारण करून त्याप्रमाणे संयुक्त बचत बँक खात्यामध्ये परतफेडीकरीता रकमा जमा करण्याची संपूर्ण जबाबदारी ही संबंधीत साखर कारखान्याच्या संचालक मंडळाची राहील.

६. साखर आयुक्तालयाने निर्धारीत केलेल्या विहीत नमुन्यामध्ये दर महिन्याच्या ०५ तारखेस मागील महिना अखेर प्रतिक्विंटल साखर विक्रीवर टॅगींगव्दारे आणि आवश्यकतेप्रमाणे प्राथमिक व दुय्यम उपपदार्थाच्या विक्रीमधून संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करण्यात आलेल्या रकमांचा तपशील, शासकीय कोषागारामध्ये चलनाव्दारे भरणा करण्यात आलेल्या रकमांचा तपशील, उपलब्ध साखर साठयाचा तपशील, विक्री केलेल्या साखरेचा तपशील, विक्री केलेल्या व शिल्लक असणाऱ्या प्राथमिक आणि दुय्यम उपपदार्थांच्या साठयाचा तपशील आणि सदर योजनेअंतर्गत संबंधीत सहकारी साखर कारखान्याच्या संचालक मंडळावर बंधनकारक असलेल्या अटी व शर्तीचे पालन झालेले आहे किंवा नाही इत्यादीबाबतचा तपशील संबंधीत सहकारी साखर कारखान्याचे कार्यकारी संचालक आणि प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त स्वाक्षरीने सदर योजनेअंतर्गत अदा करण्यात आलेल्या संपूर्ण रकमांची परतफेड होईपर्यंत साखर आयुक्तालयास सादर करणे अनिवार्य राहील.

७. कर्ज विनीयोगाबाबत कारखान्याच्या कार्यकारी संचालक यांनी दरमहा त्याबाबतचा अहवाल सविस्तर तपशीलासह प्रादेशीक सहसंचालक (साखर)

यांना सादर करावा. प्रादेशीक सहसंचालक (साखर), यांनी त्याची पडताळणी करुन त्याबाबतचा दरमहा अहवाल साखर आयुक्तालयास सादर करावा.

८. साखर कारखान्याचे संबंधीत वैधानिक लेखापरीक्षक यांनी सदर कर्ज रकमेचा विनियोग दाखला सादर करणे, तसेच सदर कर्ज रकमेच्या परतफेडीबाबतचा तपशील सविस्तरपणे त्यांचे लेखापरीक्षण अहवालामध्ये नोंदविणे आवश्यक आहे.

४. कारखान्याच्या मालमत्तेचे विवरणपत्र संबंधित कारखान्यांनी सादर करावेत. जर वसुली झाली नाही तर कारखान्यांच्या मालमत्तेतून देखील कर्जाची वसुली करण्यात येईल, याचा समावेश त्रिपक्षीय करारात करण्यात यावा.

५. सदर कर्ज रु.५९४.७६ कोटी (रुपये पाचशे चौऱ्याण्णव कोटी शहात्तर लाख फक्त) इतक्या रक्कमेची परतफेड करण्यासाठीचा कालावधी ८ वर्षे राहील, सुरुवातीचे २ वर्षे विलंबावधी (Moratorium period) असेल. विलंबावधीमध्ये (Moratorium period) व्याजाचा भरणा करणे अनिवार्य असून तदनंतर मुद्दल व व्याजासह ६ समान वार्षिक हप्त्यात ( सन २०२६-२७ ते २०३१-३२ ) कर्जाची परतफेड करावी. तसेच सन २०२४-२५ च्या गाळप हंगामापासून जे उत्पन्न मिळेल त्यातून प्राथम्याने कर्जाचा वार्षिक हप्ता (मुद्दल+व्याज) वसूल करण्याबाबत आयुक्त, साखर यांनी खात्रीशीर वसूलीसाठी निश्चित अशी व्यवस्था करावी.

६. कारखान्याकडून उत्पादन / विक्री होणाऱ्या साखरेतून मिळणारी व धनाकर्ष, RTGS, NEFT, इत्यादी स्वरुपात प्राप्त होणारी रक्कम साखर कारखाना साखर मालतारण कर्ज असणाऱ्या ज्या बँकेत भरणा करेल त्या संबंधीत बँके समवेत साखर कारखाना व साखर आयुक्त किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले प्रतिनिधी यांचेमध्ये कारखान्याने उत्पादीत व विक्री केलेल्या साखरेच्या तसेच ऊसाचा रस किंवा सिरप यांची थेट विक्री केल्यामुळे येणाऱ्या रकमेतून रु. २५०/- प्रति क्विंटल किंवा साखर आयुक्तालयाने प्रस्तावित केलेल्या त्यापेक्षा जास्तीच्या दराने टॅगींगद्वारे वसुल केलेली रक्कम कारखान्याचे कार्यकारी संचालक आणि प्रादेशिक सहसंचालक (साखर) यांचे संयुक्त बचत बँक खात्यामध्ये जमा करणेबाबत त्रिपक्षीय (Triparty Agreement) करार करण्यात यावा.

७. सदर निधी **मागणी क्रमांक व्ही (V), ६४२५ - सहकारासाठी कर्जे, (१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०३) सहकारी साखर कारखाने, (०३)(११) सहकारी साखर कारखान्यांना खेळत्या भांडवलासाठी सिमांत रक्कम म्हणून कर्ज (रा.स.वि.नि.) ५५ कर्जे व आगाऊ रक्कम (६४२५ ०६५४) (कार्यक्रमांतर्गत)** या लेखाशिर्षाखाली अंतिमत: खर्ची टकण्यात यावा.

८. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला निधी संबंधित सहकारी साखर कारखान्यांना अदा करण्यासाठी प्रस्तुत प्रकरणी लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व साखर आयुक्त, साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून प्राधिकृत करण्यात येत

आहे. त्यानुसार लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे यांनी रक्कम आहरित करून संबंधितांना अदा करण्याची कार्यवाही त्वरीत करावी.

९. संबंधित कारखान्यांनी आवश्यक कागदपत्रांची पुर्तता करण्याची वाट न पाहता कार्यालयीन ७ दिवसांत आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करण्याच्या अटीवर तात्काळ निधी वितरीत करण्यात यावा.

१०. सदर शासन निर्णय मा. मंत्रीमंडळ उपसमितीच्या दि.१२.०३.२०२४ व दि.२३.०७.२०२४ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५५६/२०२५४/व्यय-२, दि.२२.०८.२०२४ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निणर्य महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२६२०३०४८२४०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरी करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2024.08.26 21:17:58 +05'30'

**( अंकुश शिंगाडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा.मुख्यमंत्री महोदय यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री (शालेय शिक्षण व मराठी भाषा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.मा. मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११.मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१२.साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.

१३.सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर).

१४.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.

१५.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.

१६.निवड नस्ती (कार्यासन ३-स).